आदिवासी उपयोजना क्षेत्रात काम करणा-या अधिकारी व कर्मचारी यांना <u>प्रोत्साहन भत्ता देण्याबाबत...</u>

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:आस्था-१०९७/प्र.क्र.१८/का.१५,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक ५ फेब्रुवारी, १९९९**

**शासन निर्णय :-**

आदिवासी क्षेत्रात काम करणा-या कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्याच्या संदर्भात शासनाने यापूर्वी वेळोवेळी काढलेले आदेश अधिक्रमित करण्यात येत असून या संदर्भात पाचव्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय केलेल्या सुधारित वेतनश्रेणी विचारात घेऊन पुढील नियम व कार्यपध्दतीनुसार प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्याची कार्यवाही करावी असे या शासन निर्णयान्वये आदेश देण्यात येत आहेत. अधिक्रमित झालेल्या आदेशांचा अंतर्भाव परिशिष्ट - एक मध्ये करण्यात आला आहे.

१. **योजनेचे स्वरुप :-** शासनाकडून आदिवासी जमातीसाठी राबविल्या जात असलेल्या योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी विविध विभागांनी प्रशासकीय यंत्रणा निर्माण करण्यात आली आहे. तथापि, आदिवासी क्षेत्र दुर्गम व डोंगराळ असल्याने त्या ठिकाणी काम करण्यास कर्मचारी उत्सूक नसतात. त्यामुळे आदिवासी भागात वास्तव्य करुन तेथे काम करण्यास कर्मचा-यांनी प्रेरित व्हावे यासाठी शासनाने दिनांक १ जानेवारी, १९८९ पासून विशेष वेतनाच्या स्वरुपात दरमहा विशिष्ट दराने प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्याची योजना सुरु केली आहे.

२. **प्रोत्साहन भत्त्यासाठी निर्धारित केलेले क्षेत्र :-** सुरुवातीला हा प्रोत्साहन भत्ता आदिवासी उपयोजना क्षत्रातील १४ जिल्हांपैकी काही ठराविक जिल्हांतील विशिष्ट गावात कार्यरत असणा-या कर्मचा-यांना दिला जात होता. तद्नंतर याची व्याप्ती शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक - टिएसपी- १०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९० व शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक - आस्था-१९९२/प्र.क्र.५८/का.१५, दिनांक २ मे, १९९२ च्या शासन निर्णयान्वये निर्धारित केलेल्या क्षेत्रासाठी वाढविण्यात आली आहे.

३. **प्रोत्साहन भत्त्याचे दर :-** प्रोत्साहन भत्त्याचे दिनांक १ जानेवारी, १९९४ पासूनचे सुधारित दर पाचव्या वेतन आयोगानुसार केलेल्या वेतनश्रेणीनुसार पुढील प्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | पूर्वीची वेतनश्रेणी मूळ वेतन | सुधारित वेतनश्रेणी मूळ वेतन | प्रोत्साहन भत्त्याचे दर दरमहा रुपये. |
|---|---|---|---|
| १ | रु.९५० /- पेक्षा कमी | रु.३०५० /- पेक्षा कमी | रुपये १००/- |
| २ | रु.९५० /- ते १४९९ /- | रु.३०५० /- ते४५८९ /- | रुपये २००/- |
| ३ | रु.१५०० /- ते१९९९ /- | रु.४५९० /- ते६४९९ /- | रुपये ३००/- |
| ४ | रु.२०००/- ते२९९९ /- | रु.६५०० /- ते९९९९ /- | रुपये ४००/- |
| ५ | रु.३००० /- व पुढे. | रु. १०००० /- व पुढे. | रुपये ५००/- |

४. **<u>आदिवासी उपयोजना क्षेत्रात कार्यरत असलेल्या व प्रत्यक्षपणे वास्तव्य करुन राहणा-या खालील सेवेतील अधिकारी व कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय राहील</u> :-**

**(अ)** शासकीय सेवेतील अधिकारी व कर्मचारी.

**(ब)** जिल्हा परिषंदाचे अधिकारी व कर्मचारी.

**(क)** अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक,माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील पूर्णकालिक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी.

**(ड)** कृषि व कृषितर विद्यापिठे व त्यांना संलग्न असलेल्या महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी.

५. **<u>प्रोत्साहन भत्त्याच्या अटी</u> :-**

(१) प्रोत्साहन भत्ता दिनांक ३१ मार्च,२००२ पर्यंत देय राहील.

(२) प्रोत्साहन भत्ता अंशकालिक कर्मचारी व नैमित्तिक क र्मचारी यांना अनुज्ञेय राहणार नाही.

(३) ज्या जिल्हा, तालुका व नगरपालिकाची ठिकाणे आदिवासी उपयोजना क्षेत्रात समाविष्ट नाहीत ( दिनांक ९ मार्च, १९९० च्या शासन निर्णयाप्रमाणे ) अशा ठिकाणी ज्या कर्मचा-यांची मुख्यालये/कार्यालये आहेत अशा कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

(४) जास्तीत जास्त एका महिन्याच्या अर्जित रजेच्या कालावधीसाठी प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय राहील. परंतु प्रत्यार्पित रजेच्या कालावधीसाठी (रजा रोखीकरणासाठी) अनुज्ञेय असणार नाही.

(५) निलंबनाधिन असलेल्या कर्मचा-यांना त्यांचा निलंबन काळ कर्तव्य काळ म्हणुन गणला गेला तरी प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय होणार नाही.

(६) शिक्षेनंतर सेवामुक्त केलेल्या अथवा बडतर्फे केलेल्या कर्मचा-यास पुन्हा सेवेत घेऊन त्यांचा खंडीत सेवाबाहय कालावधी कर्तव्य कालावधी म्हणुन नियमित केल्यास त्या कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

(७) दिनांक ९ मार्च, १९९० च्या शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजना क्षेत्र म्हणुन घोषित केलेल्या ज्या गावांचा महानगरपालिका / नगरपालिका क्षेत्रामध्ये समावेश झाला असेल आणि त्या महानगरपालिका / नगरपालिका आदिवासी उपयोजना क्षेत्रात समाविष्ट नसतील तर त्या गावातील कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय होणार नाही.

५. **<u>इतर सुविधा</u> :-**

(१) प्रोत्साहन भत्ता व भाडेमाफ निवासस्थानाची सुविधा या २ भिन्न बाबी आहेत. भाडेमाफ निवासस्थान ही सुविधा फक्त शासनाने दिनांक २९ डिसेंबर, १९९३ च्या शासन निर्णयान्वये संवेदनशिल ठरविलेल्या ११ एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प क्षेत्रात कार्यरत असलेल्या शासकीय व जिल्हापरिषदेच्या कर्मचा-यांना अनुज्ञेय आहे.

(२) भाडेमाफ निवासस्थानाची सुविधा बदलीपात्र कर्मचा-यांसाठी असून संवेदनशिल प्रकल्पात नेमणूक झालेल्या कर्मचा-यास पूर्वीच्या ठिकाणचे निवासस्थान जास्तीत जास्त २

वर्षाच्या कालावधीसाठी ताब्यात ठेवता येईल. तथापि, नियमानुसार त्याचे भाडे अदा करावे लागेल.

(३) संवेदनशिल प्रकल्पात ज्या कर्मचा-यांना भाडेमाफ निवासस्थान उपलब्ध होणार नाही त्यांना भाडेमाफ निवासस्थानाच्या बदल्यात वित्त विभागाने विहीत केलेल्या दराने घरभाडे भत्ता देय होईल. तथापि, कर्मचा-याने भाडेमाफ निवासस्थान नाकारल्यास त्यांना घरभाडे भत्ता देय होणार नाही.

२. प्रोत्साहन भत्त्यासाठी होणारा खर्च संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते ज्या तरतूदीतून भागविले जातात त्या विभागाच्या तरतूदीतून भागविण्यात यावा व संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( कृ. तु. आव्हाड )**
**अवर सचिव**

## प रि शि ष्ट - १

| अ.क्र. | शासन निर्णय/परिपत्रक क्रमांक | दिनांक |
|---|---|---|
| १ | शासन निर्णय, आ.वि.वि.क्र.टीएसई-१०८४/प्र.क्र.१४९/ ८४/ का. १५ | २४.०१.१९८९ |
| २ | शासन निर्णय, आ.वि.वि.क्र.टीएसई-१०८४/प्र.क्र.१४९/ ८४/का.१५ | १६.०२.१९८९ |
| ३ | शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९२/प्र.क्र.३०/का.१५ | २०.०२.१९९२ |
| ४ | शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९२/प्र.क्र.५८/का.१५ | ०२.०५.१९९२ |
| ५ | शासन परिपत्रक,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९२/प्र.क्र.५८/का.१५ | ३०.०७.१९९२ |
| ६ | शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९३/प्र.क्र.२६१/का.१५ | २९.१२.१९९३ |
| ७ | शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९३/प्र.क्र.२६१/का.१५ | २८.०४.१९९४ |
| ८ | शासन परिपत्रक,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९३/प्र.क्र.२६१/का.१५ | २०.१२.१९९४ |
| ९ | शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९७/प्र.क्र.१८/का.१५ | १४.०८.१९९७ |
| १० | शासन परिपत्रक,आ.वि.वि.क्रमाक.-आस्था-१०९७/प्र.क्र.१८/का.१५ | १५.११.१९९७ |